**"ई-फेरफार व ई-चावडी" प्रकल्प संपुर्ण राज्यात राबविणेकामी तलाठी व मंडळ अधिकारी यांना डेटा कार्ड वापरासाठी प्रती डेटा कार्ड दरमहा रक्कम रूपये ७५०/- या प्रमाणे एप्रिल, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीतील शुल्काची प्रतिपुर्ति करण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: २२ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: राभूअ-२०१२/प्र.क्र.४६७/ल-१, दिनांक २८/०१/२०१३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र. ४६/ल-१ दि. १९/०३/२०२१.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१८०/ल-१, दि. ३१/०३/२०२३.
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्र. राभू-१/डाटा कार्ड/२०२४, दिनांक ०७/३/२०२४.

**प्रस्तावना**

केंद्र शासनाचा राष्ट्रिय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम राज्यात ई-महाभूमि या नावाने राबविण्यात येत असून त्या अंतर्गत ई-चावडी, (गाव दप्तराचे संगणकीकरण) व ई-फेरफार (फेरफार प्रक्रीयेचे संगणकीकरण) प्रकल्प राज्यभरात राबविण्यात येत आहे. ई-फेरफार व ई-चावडी या प्रकल्पाची संपूर्ण राज्यात अमंलबजावणी करण्याकरीता मंडळ अधिकारी व तलाठी यांचेकडील लॅपटॉप स्टेट डेटा सेंटरवरील सर्व्हर बरोबर जोडणी करण्यासाठी डेटा कार्डव्दारे कनेक्टिव्हीटी स्थापित करणे अनिवार्य आहे. त्याअनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये ई- महाभूमि अंतर्गत ई- फेरफार व ई- चावडी आज्ञावलीच्या अंमलबजावणीसाठी राज्यातील संबंधित मंडळ अधिकारी/ तलाठी यांच्या लॅपटॉपची स्टेट डेटा सेंटरवरील सर्व्हर बरोबर जोडणी करण्यासाठी डेटा कार्डव्दारे कनेक्टिव्हीटी स्थापित करण्यासाठी तसेच ई-फेरफार व ई-चावडी आज्ञावलीमध्ये एस.एम.एस. वापरासाठी डाटाकार्ड करीता दरमहा रू. ७५०/- प्रमाणे प्रतिपूर्ती स्वरुपात शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ अन्वये माहे एप्रिल २०२२ ते मार्च ,२०२३ या कालावधीसाठी डेटा कार्ड शुल्क अदा करण्यासाठी रू.१३,९६,८०,०००/- (अक्षरी तेरा कोटी शहाण्णव लाख ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यात आली होती. आता, माहे एप्रिल, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीत ई-फेरफार प्रकल्प सुरळीतपणे सुरू राहण्यासाठी संबंधित मंडळ अधिकारी व तलाठी यांना दरमहा रू. ७५०/- प्रमाणे एकूण र.रु.१२,००,००,०००/- ( अक्षरी बारा कोटी फक्त)इतका निधी डेटा कार्ड शुल्काच्या प्रतिपूर्तीसाठी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१. ई-महाभूमि अंतर्गत ई-फेरफार व ई-चावडी या आज्ञावलीच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यातील संबंधित तलाठी व मंडल अधिकारी यांच्या लॅपटॉपची स्टेट डेटा सेंटरच्या सर्व्हरमधील आज्ञावलीशी इंटरनेटव्दारे कनेक्टिव्हिटी स्थापित करण्यासाठी तसेच ई-फेरफार व ई-चावडी आज्ञावलीमध्ये एसएमएस वापरासाठी डेटा कार्ड करीता प्रतिपूर्ती स्वरूपात प्रतिडेटा कार्ड रूपये ७५०/- दरमहा याप्रमाणे एप्रिल,२०२३ ते मार्च,२०२४ अखेर एकूण र.रु.१२,००,००,०००/- (अक्षरी बारा कोटी फक्त) इतका निधी सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था, राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम महाराष्ट्र राज्य या संस्थेच्या स्टेट बँक आफ इंडिया पुणे येथील मुख्य शाखेतील बचत खाते क्रमांक ३२८८८७७६४०६ मध्ये जमा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य पुणे यांनी डेटा कार्ड धारण करणा-या पात्र तलाठी व मंडल अधिकारी यांना प्रतिपूर्ती स्वरूपात हा निधी जिल्हाधिकारी यांचेकडे वितरीत करावा.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. सी.१, २०२९ जमीन महसुल १०३, जिल्हा भूमि अभिलेख (०२) संचालक भूमि अभिलेख २०२९ ०४२२ (१७) संगणक खर्च (योजनेतर)" या लेखाशिर्षा खाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातुन खर्ची टाकण्यात यावा.

४. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म. राज्य), पुणे यांनी सदर निधी आहरित करून महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेच्या बँकेच्या बचत खाते क्रमांक ३२८८८७७६४०६ मध्ये जमा करणेची त्वरीत कार्यवाही करावी. जिल्हाधिकारी यांनी सदर निधीचे विनियोगासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देणेची दक्षता घ्यावी. प्रस्तुत निधीबाबत जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२२१६३०२०४११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2024.03.22 16:39:40 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव.
सर्व विभागीय आयुक्त.
जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
कोषागार अधिकार, पुणे.
वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई.
माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, ल-१.

परिशिष्ठ - अ

| अ. क्र. | विभाग | जिल्हा | तलाठी / मंडळ अधिकारी यांची संख्या | मागणी रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | पुणे | पुणे | ६९९ | ६२९१००० |
| २ | | सातारा | ५१६ | ४६४०२५० |
| ३ | | सांगली | ३३६ | ३०२४००० |
| ४ | | सोलापूर | ७४५ | ६७०५००० |
| ५ | | कोल्हापूर | ५०६ | ४४४३००० |
| ६ | नाशिक | नाशिक | ८२८ | ७४५२००० |
| ७ | | अहमदनगर | ६८३ | ६१२८९५० |
| ८ | | धुळे | २६४ | २५४५५०० |
| ९ | | नंदुरबार | २२० | १९८०००० |
| १० | | जळगाव | ४९९ | ४३९८००० |
| ११ | कोकण | मुंबई उपनगर | ५२ | ४०५००० |
| १२ | | ठाणे | २५९ | २३३१००० |
| १३ | | पालघर | ३०७ | २७६३००० |
| १४ | | रायगड | ३१२ | २८०८०० |
| १५ | | रत्नागिरी | ३९१५ | २९३६२५० |
| १६ | | सिंधुदुर्ग | ३९२ | ३५२८००० |
| १७ | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर | ४०८ | ३६७२००० |
| १८ | | बीड | ४०५ | ३६४५००० |
| १९ | | जालना | ३३५ | ३०१५००० |
| २० | | धाराशिव | २९१ | २६१९००० |
| २१ | | लातूर | ३६९ | ३३२१००० |
| २२ | | नांदेड | ६३४ | ५७०६००० |
| २३ | | परभणी | २५७ | २३१३००० |
| २४ | | हिंगोली | २०१ | १८१८००० |
| २५ | अमरावती | अमरावती | ४५६ | ४१०४००० |
| २६ | | अकोला | ३३७ | ३०३३००० |
| २७ | | यवतमाळ | ६४० | ५७६०००० |
| २८ | | बुलढाणा | ५८४ | ५२५६००० |
| २९ | | वाशीम | २८५ | २५६५००० |
| ३० | नागपूर | नागपूर | ६०७ | ५४६३००० |
| ३१ | | चंद्रपूर | ४३२ | ३८८८००० |
| ३२ | | गडचिरोली | २४१ | २११९५०० |
| ३३ | | भंडारा | १६९ | १८५०७५० |
| एकूण | | | १७१८४ | १२००००००० |